नागपूर-नागभीड या नवीन रेल्वेमार्गाकरीता राज्य हिश्श्याचा रु.१७०.२२ कोटी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. आरएलवाय-०८२२/प्र.क्र.१९९/परिवहन-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०९ मार्च, २०२३

वाचा : १) गृह विभाग, शासन निर्णय क्र.आरएलवाय-०६१२/प्र.क्र.७८/१२/पुनर्बांधणी-२/ परि-५, दिनांक ३० जुलै, २०२०.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल,२०२२.
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास महामंडळ, लि. (MRIDC), मुंबई यांचे दिनांक ०५.०९.२०२२ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

नागपूर-नागभीड रेल्वे प्रकल्प महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनीमार्फत (MRIDC) मार्फत ६०% कर्ज आणि ४०% समभाग याप्रमाणे राबविण्यात येणार आहे. प्रकल्पाच्या रु.१४०० कोटीच्या सुधारीत अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रकल्प खर्चात राज्य शासनाचा ५०% आर्थिक सहभाग आहे. प्रकल्प किंमतीच्या ४०% नुसार रु.५६० कोटीच्या समभाग मुल्यातील अर्धा हिस्सा रु.२८० कोटी राज्य शासनामार्फत आणि उर्वरीत अर्धा हिस्सा रु.२८० कोटी केंद्र शासनाने अदा करण्यास उपरोक्त शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या समभागमुल्यातील राज्य हिश्श्याच्या रु.२८० कोटीपैकी रु.८२.७८ कोटी इतका निधी दिनांक ३१.०३.२०२२ पर्यंत महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनीस (महामंडळास) (MRIDC) वितरित करण्यात आला आहे. सदर प्रकल्पासाठी राज्य हिश्श्याच्या रु.२८० कोटीपैकी उर्वरीत रु.१७०.२२ कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (महामंडळ) (MRIDC), मुंबई यांना प्रस्तावनेत नमूद प्रयोजनासाठी रु.१७०.२२ कोटी (रुपये एकशे सत्तर कोटी बावीस लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासनाने सह सचिव/उप सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग यांना नियंत्रण अधिकारी व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केलेले असून या शासन निर्णयाव्दारे त्यांना सदर रक्कम प्रदान करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी येणारा खर्च मागणी क्र.बी-७, ३००१ भारतीय रेल्वे धोरण निश्चिती, संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, ००, ८००-इतर खर्च, (००), (००) (०२)-रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग (३००१ ००५४), ३२-अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. महाराष्ट्र शासन, वित्त विभाग, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर देयकांव्दये आहरीत करण्यात येणा-या रक्कमेचे स्वरुप “अंशदाने” या तपशीलवार शिर्षाखाली येते. त्यानुसार तपासणी करावयाच्या सुचीत नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींचे पालन करण्यात आले आहे.

५. प्रमाणित करण्यात येते की, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील क्रमांक १ ते १० मधील अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२१/१४६१, दिनांक १७.०२.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१११/२०२३/व्यय-८, दिनांक २८.०२.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०९१७४२२५३०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

MURLIDHAR MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=282312ebca8590dedb8028575064d7754a3c5702d668b43d226ef7b32ee3a517, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2023.03.09 17:46:21 +05'30'

**( मुरलीधर मुंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (MRIDC), मुंबई.
५) बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) वित्त विभाग, व्यय-८/बीयुडी-११, मंत्रालय, मुंबई.
७) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
८) रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कम ही Maharashtra Rail Infrastructure Development Corporation Limited-MRIDC यांना धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.
९) निवड नस्ती परिवहन-५.